**"महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजने अंतर्गत ग्राम रोजगार सेवकांचे मानधनात सुधारणा करणेबाबत"**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन (रोहयो) विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक :- मग्रारो-२०२३/प्र.क्र.३३/रो-७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- १६ मे, २०२३

**वाचा :**

१) नियोजन (रोहयो) विभाग शासन निर्णय क्र.मग्रारोहयो-२००६/प्र.क्र.१०४/रोहयो १०, दिनांक १९ ऑक्टोबर, २००६

२) नियोजन (रोहयो) विभागाचे शासन परिपत्रक क्र.मग्रारोहयो-२०१०/प्र.क्र.४९/रोहयो-१०, दिनांक ०५ जुन, २०१०

३) नियोजन (रोहयो) विभाग शासन परिपत्रक क्र. मग्रारोहयो-२०११/प्र.क्र.४०/रोहयो-१०अ, दिनांक ०२ मे, २०११

४) शासन निर्णय, नियोजन (रोहयो) विभाग क्र. दिनांक २६ फेब्रुवारी, २०१३

५) नियोजन (रोहयो) विभाग शासन निर्णय क्र.मग्रारोहयो-२०१०/प्र.क्र.४८/रोहयो-१०, दिनांक ०१ मार्च,२०१४

६) महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत राज्य नियामक मंडळाची बैठक, दिनांक २७ ऑगस्ट, २०१९ रोजीचे इतिवृत्त

७) नियोजन (रोहयो) विभाग शासन निर्णय क्र.मग्रारोहयो-२०२०/प्र.क्र.१२५/रोहयो-७, दिनांक ०८ मार्च, २०२१

**प्रस्तावना :**

२. नियोजन (रोहयो) विभाग शासन निर्णय क्रमांक मग्रारो-२०२०/प्र.क्र.१२५/मग्रारो-३ दिनांक ०८ मार्च, २०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजने अंतर्गत एकूण निर्माण होणा-या संचयीत मनुष्यदिवसाच्या अनुषंगाने प्रतिमाह एकत्रित मानधन बाबतचे विवरण खालील नमूद केलेल्या तक्ता क्रमांक ३ प्रमाणे मान्य करण्यात आलेले आहे. (माहे एप्रिल २०२० पासून) (सदरील मानधन हे सर्व बाबींचा विचार करुन दरमहा एकत्रितपणे निश्चित करण्यात आलेले आहे)

| अ.क्र. | मनुष्यदिवस | वार्षिक मानधन | मासिक मानधन |
|---|---|---|---|
| १ | ० - ७५० | प्रचलित पध्दतीनुसार ६% (एकूण कामाच्या) | |
| २ | ७५१ - १५०० | २४००० | २००० |
| ३ | १५०१ - २५०० | ३६००० | ३००० |
| ४ | २५०१ - ४००० | ४२००० | ३५०० |
| ५ | ४००१ - ५५०० | ४८००० | ४००० |
| ६ | ५५०१ - ७००० | ५४००० | ४५०० |
| ७ | ७००१ - ८००० | ६०००० | ५००० |
| ८ | ८००१ - ९००० | ६८४०० | ५७०० |
| ९ | ९००१ - १०००० | ७६८०० | ६४०० |

१०००० मनुष्यदिवसाच्या पुढे प्रत्येक १००० मनुष्य दिवसापर्यंत रु.७००/- ची वाढ करुन गणना करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. सद्य:स्थितीत महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत बाहयस्थ संस्थेमार्फत कंत्राटी पध्दतीने उपलब्ध करुन घेतलेल्या मनुष्यबळाच्या सेवेत माहे जुलै २०२१ पासून मासिक मानधनवाढ करण्यास मंजूरी देण्यात आलेली आहे. त्या अनुषंगाने ग्राम रोजगार सेवक यांच्या मानधनात वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक :-**

४. नियोजन (रोहयो) विभाग शासन निर्णय क्रमांक मग्रारो-२०२०/प्र.क्र.१२५/मग्रारो-३ दिनांक ०८ मार्च, २०२१ रोजीच्या शासन निर्णयातील तक्ता क्रमांक ३ मध्ये नमूद केलेल्या मानधनात माहे जुलै २०२१ पासून खालीलप्रमाणे सुधारणा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | मनुष्यदिवस | वार्षिक मानधन | मासिक मानधन |
|---|---|---|---|
| १ | १ - ७५० | प्रचलित पध्दतीनुसार ६% (एकूण कामाच्या) | |
| २ | ७५१ - १५०० | ३०००० | २५०० |
| ३ | १५०१ - २५०० | ४२००० | ३५०० |
| ४ | २५०१ - ४००० | ५०४०० | ४२०० |
| ५ | ४००१ - ५५०० | ६०००० | ५००० |
| ६ | ५५०१ - ७००० | ६६००० | ५५०० |
| ७ | ७००१ - ८००० | ७४४०० | ६२०० |
| ८ | ८००१ - ९००० | ७८००० | ६५०० |
| ९ | ९००१ - १०००० | ८४००० | ७००० |

१०००० मनुष्यदिवसाच्या पुढे प्रत्येक १००० मनुष्य दिवसापर्यंत रु.७००/- ची वाढ करुन गणना करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे.

५. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२३०५१७१७१५४९०६१६ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by NANDKUMAR VERMA
Date: 2023.05.17 17:18:18 +05'30'

**नंदकुमार**
**अपर मुख्य सचिव (रोहयो), महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) सर्व विभागीय आयुक्त,
२) आयुक्त, नरेगा, नागपूर

३) सर्व जिल्हा कार्यक्रम समन्वयक तथा जिल्हाधिकारी
४) सर्व सह जिल्हा कार्यक्रम समन्वयक तथा मुख्य कार्यकारी अधिकारी
५) सर्व उपआयुक्त (रोहयो) विभागीय आयुक्त कार्यालय.
६) सर्व उपजिल्हाधिकारी (रोहयो), जिल्हाधिकारी कार्यालय.
७) सर्व उपमुख्य कार्यकारी अधिकारी (रोहयो/ग्रा.पं.)
८) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
९) सहाय्यक संचालक (रोहयो), नियोजन विभाग, मंत्रालय मुंबई.
१०) निवडनस्ती, रोहयो-७

**प्रत माहितीसाठी,**

१) मा.मंत्री, रोहयो यांचे खाजगी सचिव.
२) अपर मुख्य सचिव, रोहयो यांचे स्वीय सहाय्यक.